



# महाराष्ट्र शासन

**क्रमांक:- गौखनि-३३/१११५/प्र.क्र.५८२/ख-१**

महसूल व वन विभाग,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ११ मे, २०२२.

विषय:-<u>गौण खनिज-अहमदनगर</u>
**सन २०१४-२०१५ करीता मौजे मळेगाव थडी, ता.कोपरगांव या वाळूगटाचा ताबा देता आला नसल्याने वाळूगटाच्या लिलावाची रक्कम परत करणेबाबत.**
**श्री.गुरुकृपा बिल्डींग मटेरियल सप्लायर्स तर्फे श्री.संदिप दि.गाडे**

**<u>शासन ज्ञापन :-</u>**

जिल्हाधिकारी, अहमदनगर यांना त्यांचे पत्र क्र.गौख/का.४क/८३९/२०१५, दि.२२/६/२०१५ व क्र.गौख/कार्या ४ क/५४५/२०२०, दि. /९/२०२० रोजीच्या उपरोक्त विषयावरील पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०१४-२०१५ या वर्षाकरीता दि.१५/१/२०१५ रोजी घेण्यात आलेल्या लिलावात मौजे मळेगाव थडी, ता.कोपरगाव, जि.अहमदनगर हा वाळूगट श्री.गुरुकृपा बिल्डींग मटेरियल सप्लायर्स तर्फे श्री.संदिप दिनकर गाडे यांना ७७३९ ब्रास वाळू परिमाणाकरीता रू.१,५३,०१,१९१/- एवढ्या सर्वोच्च बोलीस मंजूर करण्यात आला. लिलावधारकाने लिलावाची संपूर्ण रक्कम शासनजमा केल्यानंतर लिलावधारक यांचेसोबत दि.३०/६/२०१५ रोजी करारनामा केला.

**०२.** सदर वाळूगटामध्ये पाणी असल्याने सक्शन पंपाची परवानगी मिळणेबाबत लिलावधारक यांनी दि.२६/८/२०१५ रोजीचे अर्जान्वये जिल्हाधिकारी यांना विनंती केली असता, जिल्हाधिकारी, अहमदनगर यांना विहित कालावधीत लिलावधारक यांना सक्शन पंपाद्वारे वाळू उत्खनन करण्याची परवानगी देता आली नाही. वाळूगटामध्ये पाणी असल्याने लिलावधारक यांना वाळूगटाची मुदत संपेपर्यत म्हणजेच दि.३०/९/२०१५ पर्यंत वाळूगटाचा ताबा देता आला नाही. याबाबत लिलावधारक श्री.गुरुकृपा बिल्डींग मटेरियल सप्लायर्स तर्फे श्री.संदिप दिनकर गाडे यांनी मा.मंत्री (महसूल) यांचेकडे दाखल केलेल्या अपील अर्जावर मा.मंत्री (महसूल) यांनी दि.११/९/२०२१ रोजी आदेश पारीत केले आहेत. मा.मंत्री (महसूल) यांनी पारीत केलेल्या आदेशानुसार मंजूर ७७३९ ब्रास वाळू परिमाणापोटी परताव्याची रक्कम परिगणित करुन लिलावधारकास रक्कम रू.१,५३,०१,१९१/- (रुपये एक कोटी त्रेपन्न लाख एक हजार एकशे एक्याण्णव फक्त) परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

**०३.** लिलावधारक श्री.गुरुकृपा बिल्डींग मटेरियल सप्लायर्स तर्फे श्री.संदिप दिनकर गाडे यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर उत्खनन न करता आलेल्या वाळूची प्रमाणशीर रक्कम रू.१,५३,०१,१९१/- (रुपये एक कोटी त्रेपन्न लाख एक हजार एकशे एक्याण्णव फक्त) अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०४.** या बाबीवर होणारा खर्च सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०५.** सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७६/२०२२/व्यय-०९, दि.२३/०२/२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०५१११५४९३५१०१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, pseudonym=0592554E096862442D21372FBE05C91C3D50FA17, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2022.05.11 15:52:07 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

जिल्हाधिकारी,अहमदनगर

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४, साधनसंपत्ती कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) निवडनस्ती (कार्यासन “ख-१”), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.